२०२००१०९९३४११८८९७

कोवीड-१९ च्या पार्श्वभुमीवर डॉ.सुभाष साळुंखे (निवृत्त महासंचालक, आरोग्य सेवा) यांची पुणे विभागासाठी मुख्य समन्वयक म्हणून नेमणूक करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
गो. ते. रुग्णालय संकुल इमारत,
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक: ६ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ :-** १) साथरोग अधिनियम १८९७
२) शासन अधिसूचना क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.५८/आ-५, दिनांक १४.०३.२०२०
३) राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन कायदा,२००५

**प्रस्तावना :-**

सद्यस्थितीत पुणे विभागात कोविड साथीचा प्रादुर्भाव मोठया प्रमाणात होत असल्याचे निर्दशनास येत आहे. आज मितीस राज्यात सर्वाधीक बाधीत व उपचाराखालील रुग्ण पुणे विभागात आहेत. यास्तव कोविड-१९ साथरोग नियंत्रणसाठी राज्यस्तरावरुन विविध उपाययोजना करण्यात येत आहेत. यात विविध तज्ञांच्या सेवा ही घेण्यात येत आहेत. केंद्र शासन व राज्यशासनाकडून साथरोग नियंत्रणाच्या अनुषंगाने विविध मार्गदर्शक सुचनांची अंमलबजावणी तातडीच्या उपाययोजना व आवश्यकतेनुसार मार्गदर्शन तसेच पुणे विभागात केलेल्या अथवा करावयाच्या उपायोजना व या अनुषंगाने आयोजित विविध आढावा बैठकांच्या क्षेत्रीय कार्यालय, विभागीय आयुक्त व राज्यशासन यांचेतील समन्वयासाठी आरोग्य सेवेचा अनुभव असलेली अनुभवी व तज्ञ व्यक्तीचा पुणे विभागासाठी मुख्य समन्वयक म्हणून नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

डॉ.सुभाष साळुंखे (निवृत्त महासंचालक, आरोग्य सेवा) यांची पुणे विभागासाठी मुख्य समन्वयक म्हणून नेमणूक करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

मुख्य समन्वयक म्हणून डॉ.साळुंखे यांच्या कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहतील :-

१) केंद्र व राज्य शासनाने निर्गमित केलेल्या साथरोग नियंत्रणाबाबतच्या सुचनांच्या अनुषंगाने होत असलेल्या अंमलबजावणीचा आढावा घेणे, अंमलबजावणीतील त्रुटी राज्य शासनाच्या निदर्शनास आणणे व साथरोग नियंत्रणासाठी प्रभावी उपाययोजना सुचविणे.
२) राज्यशासन तसेच खाजगी रुग्णालयांमध्ये गरजु रुग्णांना खाटा उपलब्ध करण्यासाठी, आवश्यक त्या सुविधा निर्माण करण्यासाठी तसेच अंमलबजावणीसाठी समन्वय साधणे.

३) राज्यशासन तसेच पालकमंत्री यांचेकडून घेतलेल्या आढावा बैठकीमध्ये व बैठकीदरम्यान दिलेल्या सुचनांची अंमलबजावणी प्रभाविपणे करण्यासाठी समन्वय साधणे.

या कामासाठी पुणे विभागातील सर्व संबंधित यंत्रणांनी डॉ.सुभाष साळुंखे (निवृत्त महासंचालक, आरोग्य सेवा) यांना पुर्णपणे सहकार्य करण्याबाबत निर्देशित करण्यात येत आहे.

डॉ.सुभाष साळुंखे (निवृत्त महासंचालक, आरोग्य सेवा) यांची मुख्य समन्वयक म्हणून यांना आवश्यक असलेला कर्मचारी वृंद, साधनसामग्री व बैठक व्यवस्था विभागीय आयुक्त कार्यालय विभागीय आयुक्त पुणे यांचेकडून उपलब्ध करुन देण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२००९०८११३५१४९८१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावांने,

Archana 6/10/2020

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) अपर मुख्य सचिव, महसुल विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सचिव, मदत व पुर्नवसन, मंत्रालय, मुंबई
८) विभागीय आयुक्त पुणे
९) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१०) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई
११) आयुक्त, महानगरपालीका (पुणे विभाग सर्व)
१२) जिल्हाधिकारी (पुणे विभाग सर्व)
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, (पुणे विभाग सर्व)
१४) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
१५) जिल्हा शल्यचिकित्सक (पुणे विभाग सर्व)
१६) जिल्हा आरोग्य अधिकारी (पुणे विभाग सर्व)
१७) निवड नस्ती (आरोग्य ५)

प्रत माहितीस्तव- डॉ.सुभाष साळुंखे (निवृत्त महासंचालक, आरोग्य सेवा), मुख्य समन्वयक, पुणे विभाग.